कांदळवनाच्या संवर्धनाबाबत............

# महाराष्ट्र शासन,

## पर्यावरण विभाग,

### शासन निर्णय, क्रमांक - इएनव्ही २००१/९८३/प्र.क्र.३१/तां.क.१

### दिनांक २५ ऑक्टोबर २००१

**प्रस्तावना :**

समुद्रकिना-याच्या व खाडीच्या दलदलीच्या क्षेत्रात वाढणा-या तथा समुद्रकिना-याचे व किना-याजवळील जमिनीचे संरक्षण करणा-या , जैविक विविधता टिकवून ठेवणा-या व प्रदुषण कमी करणा-या कांदळवनाचे ( खारफुटी ) महत्व असाधारण आहे. कांदळवनाचे पर्यावरणीय दृष्टया महत्व विचारात घेता त्याचे संरक्षण,संवर्धन व विकास करणे गरजेचे आहे.

महाराष्ट्र शासनाने केंद्र शासनाच्या धोरणानुसार राज्यस्तरावरील कांदळवनाच्या विकासासाठी एक सुकाणू समितीची स्थापना केली आहे. कांदळवन हे समुद्रकिना-याच्या व खाडीच्या जमिनीच्या क्षेत्रात शासकीय तसेच खाजगी जमिनीवर असते. महाराष्ट्रातील विशेषत: मुंबई,ठाणे शहरातील कांदळवनाच्या -हासाबाबत नेहमीच तक्रारी येत असतात. कांदळवनाचे -हास होत राहिल्यास पर्यावरणाचा धोका निर्माण होण्याची शक्यता नाकारता येत नाही.

कांदळवनाचे संरक्षण व संवर्धन करण्याबद्दलची कामे ही अनेक विभागाशी संबंधित आहेत. उदा. वन विभाग, महसूल विभाग, नगर विकास विभाग इत्यादि. कांदळवनाचे -हास झाल्यास याबाबतची योग्य ती कारवाई शासनाच्या कोणत्या विभागाकडून करण्यात येते याबद्दल [illegible] निर्माण होतो. तक्रारी संबंधित विभागाकडे न पोहोचल्याने कारवाई करणे शक्य होत नाही. कांदळवनाच्या संरक्षणाबाबतची कार्यवाही कोणत्या विभागाने करावी हा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. आता शासन खालीलप्रमाणे आदेश देत आहे :-

**शासन निर्णय :**

१. कांदळवनाचे (खारफुटी) क्षेत्र (जमिन) ज्या विभागाच्या अखत्यारित आहे त्या विभागाने त्या क्षेत्रात कांदळवनाची अवैध कटाई/नुकसान झाल्यास त्या संबंधित विभागाने प्रचलित नियमाप्रमाणे कारवाई करणे त्या विभागाची जबाबदारी राहील.

२ कोणत्याही कामामुळे कांदळवनाचे नुकसान होऊ नये याची काळजी संबंधित विभागाने घ्यावी व कांदळवनाचे नुकसान करणा-या कोणत्याही कामांना (उदा.बांधीव करणे, खोदकाम,इंधीन करणे इत्यादि) परवानगी देऊ नये.

GR-2002081417285000-2200

एम७२९(६५०-१०-०१)७

संबंधित विभागाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या कोणत्याही कामामुळे कांदळवनाचे नुकसान होत असल्यास सदर कामाचा तपशील पर्यावरण विभागास पाठवावा. प्रस्तुत प्रकरणी पर्यावरण संरक्षण कायदा १९८६ अन्वये पुढील कार्यवाही पर्यावरण विभागातर्फे करण्यात येईल.

३ खाजगी क्षेत्रात कांदळवनाचे नुकसान झाल्यास याबाबतचा तपशील व पुढील कार्यवाही महसूल विभागातर्फे करण्यात येईल. आवश्यकता वाटल्यास पर्यावरण संरक्षण कायदा १९८६ प्रमाणे आवश्यक ती कारवाई पर्यावरण विभागातर्फे करण्यात येईल.

पर्यावरण संरक्षण कायदा १९८६ चे कलम ५ खाली प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करुन सदरहू आदेश काढण्यात येत आहेत.

(आ.ग.आढाव)
अवर सचिव, पर्यावरण विभाग

प्रति,

१ राज्यपालांचे सचिव,
२ मुख्यमंत्र्यांचे सचिव,
३ सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४ मुख्य सचिव
५ अतिरिक्त मुख्य सचिव,
६ शासनाचे सर्व प्रधान सचिव/सर्व सचिव,
७ प्रधान मुख्य वन संरक्षक,महाराष्ट्र राज्य, नागपूर
८ विभागीय आयुक्त, कोकण विभाग,कोकण
९ आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई
१० आयुक्त, ठाणे महानगरपालिका,ठाणे
११ आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, बांद्रा (पूर्व) मुंबई ४०० ०५१
१२ सदस्य सचिव, म.प्र.नि. मंडळ,मुंबई.
१३ सर्व मंत्रालयीन विभाग (विधी व न्याय विभाग वगळून)
१४ निवड नस्ती,ता.क.१